# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### सुशिक्षित बेरोजगार सहकारी संस्थेने त्यांच्या प्रलंबित मागण्यांबाबत

**(१) २१०६ (२८-०१-२०१५). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र राज्य सुशिक्षित बेरोजगार सहकारी संस्था जिल्हा फेडरेशन राज्यस्तरीय कृती समितीने त्यांच्या प्रलंबित मागण्यांबाबत शासनास निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, १० लक्ष रुपयापर्यंतच्या विना निविदा कामे देण्याचे शासनाने मान्य केले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या प्रकरणी शासन आपल्या निर्णयाची अंमलबजावणी करणार आहे काय,

(४) असल्यास, ते केव्हापर्यंत करणार आहे ?

**श्री.जयकुमार रावल (३१-०१-२०१९) :** (१) महाराष्ट्र राज्य सुशिक्षित बेरोजगार सहकारी संस्था जिल्हा फेडरेशन राज्यस्तरीय कृती समितीचे निवेदन शासनास प्राप्त झाले आहे.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## येऊर (जि.ठाणे) येथील गोल्डन स्वॉन कंट्री क्लब बेकायदेशीररित्या सुरू असल्याबाबत

**(२) १०१८० (३०-०७-२०१५). श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) येऊर, (जि.ठाणे) येथील गोल्डन स्वॉन कंट्री क्लबच्या परवान्यांची मुदत माहे फेब्रुवारी, २०१४ मध्ये संपली असल्याची बाब माहे ऑगस्ट, २०१४ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गोल्डन स्वॉन कंट्री क्लब ने परवाना नुतनीकरणासाठी वेळेत प्रस्ताव सादर केलेला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, परवाना नुतनीकरण झालेला नसतानाच त्यांनी बेकायदेशीररित्या क्लब सुरु ठेवला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, या ठिकाणी अवैधपणे छोटेछोटे कॉटेज बांधण्यात आले असून पाण्याचाही अवैधपणे वापर सुरु आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, परवाना नुतनीकरण करुन न घेता अवैधपणे सर्व गोष्टी सुरु असल्याने स्थानिकांमध्ये चिंतेचे वातावरण पसरले असून कायदा व सुव्यवस्था बिघडू शकते अशी स्थानिकांची धारणा झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(६) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे वा करण्यात येत आहे,

(७) असल्यास, चौकशीनंतर संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०१-२०१९) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.

(४) गोल्डन स्वान कंट्री क्लब येथील सर्व बांधकामे अधिकृत असून त्यासाठी अधिकृत टॅक्स अदा केले जात आहे. तसेच महानगरपालिकेने पाण्याचे अधिकृत कनेक्शन दिलेले नसून टँकद्वारे व बोअरवेलच्या पाण्याचा वापर केला जात आहे.

(५) हे खरे नाही.

(६) व (७) प्रश्न उद्भवत नाही.

# राज्यात रस्ता अपघातातील रुग्णांना औषधोपचाराची सुविधा उपलब्ध होणेबाबत

**(३) १३५४५ (२२-१२-२०१५). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात मागील वर्षी रस्ता अपघातातील मृतांच्या संख्येत १५ टक्के वाढ झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी केली आहे काय,

(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले,

(४) असल्यास, अपघात स्थळी लवकरात लवकर औषधोपचार मिळणे तसेच लोकांमध्ये जनजागृती होण्याबाबत शासनाने कोणती प्रभावी उपाययोजना केली वा कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) राज्यातील रस्त्यांवर सन २०१३ ते २०१५ या कालावधीमध्ये झालेले अपघात व मृतांची सांख्यिकी माहिती दर्शविणारा तक्ता खालीलप्रमाणे :-

| वर्ष | अपघात संख्या | मृतांची संख्या |
|---|---|---|
| २०१३ | ११,३३६ | १३,०२९ |
| २०१४ | ११,५२८ | १२,८०३ |
| २०१५ | १२,००९ | १३,२१२ |

वरील तक्त्यानुसार राज्यातील अपघातातील मृतांच्या प्रमाणात सन २०१४ च्या तुलनेत सन २०१५ मध्ये ३ टक्के वाढ झाल्याचे दिसून येते.

(२) व (३) होय.

महामार्ग तसेच रस्त्यावर अपघात झाल्यास स्थानिक पोलीस ठाणे तसेच महामार्ग पोलिसांकडून अपघातग्रस्तांना तात्काळ मदतकार्य पुरविण्यात येते. तसेच अपघाताबाबत स्थानिक पोलीस ठाण्यास तात्काळ गुन्हा नोंदविण्यात येऊन आवश्यक ते सहकार्य करण्यात येते.

सदर अपघातांच्या कारणांचा विचार केला असता खालीलप्रमाणे बाबी आढळल्या आहेत.

| | |
|---|---|
| मानवी घटक | : ७० ते ७५ टक्के |
| नैसर्गिक घटक | : ७ ते ९ टक्के |
| इतर घटक | : १३ ते १६ टक्के |

(४) महामार्ग तसेच रस्त्यावर अपघात झाल्यास स्थानिक पोलीस ठाणे तसेच महामार्ग पोलिसांकडून अपघातग्रस्तांना तात्काळ मदतकार्य पुरविण्यात येते तसेच वैद्यकीय मदतीकरीता नजिकच्या शासकीय/खाजगी रुग्णालयात उपचाराकरीता दाखल केले जाते. अपघातग्रस्त वाहने क्रेनच्या सहाय्याने बाजूला करुन वाहतुक सुरळीत केली जाते. तसेच अपघाताबाबत गुन्हा नोंदवून योग्य ते सहकार्य करण्यात येते.

लोकांमध्ये जनजागृती होण्याकरीता शासनातर्फे दरवर्षी संपूर्ण राज्यात "रस्ता सुरक्षा अभियान" राबविले जाते. पोलीस विभाग, आरोग्य विभाग, बांधकाम विभाग, शालेय शिक्षण विभाग यांचेसह जनप्रबोधनाकरीता विविध कार्यक्रम आयोजित करण्यात येतात. केंद्र शासनाच्या रस्ते सुरक्षा अभियानासंबंधीच्या अधिसूचनेस स्थानिक वृत्तपत्रे व प्रसारमाध्यमे यांचेमार्फत जनजागृती केली जाते.

राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या आपात्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्पांतर्गत राज्यभरात एकूण ९३७ रुग्णवाहिका अहोरात्र तत्वावर कार्यरत आहेत. त्यापैकी ७०४ रुग्णवाहिका बेसिक लाईफ सपोर्ट (BLS) असून २३३ रुग्णवाहिका ॲडव्हान्स लाईफ सपोर्ट (ALS) स्वरुपाच्या आहेत. आपत्कालीन परिस्थितीत रुग्ण/संबंधित नातेवाईक यांना १०८ या टोल फ्री क्रमांकावर संपर्क केल्यास रुग्णवाहिका प्रत्यक्ष घटनास्थळी येते. सदर रुग्णवाहिकांमध्ये अत्याधुनिक उपचारयंत्रे तसेच प्रशिक्षित डॉक्टर व प्रशिक्षित वाहनचालक तैनात असतात. सदर सेवा ही पूर्णपणे मोफत असून सदर प्रकल्प कार्यान्वित झाल्यापासून म्हणजे माहे फेब्रुवारी, २०१४ ते सप्टेंबर, २०१६ पर्यंत राज्यातील एकूण ११,१६,०१३ गरजू रुग्णांनी याचा लाभ घेतला आहे. यापैकी १,४२,२१७ अपघातग्रस्त रुग्णांना सदर सेवा पुरविण्यात आलेली आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शहर पोलीस भरतीत आरक्षित पदांना डावल्याबाबत

**(४) १८३०७ (२९-०४-२०१६). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर शहर पोलीस भरतीत आरक्षित पदांना डावलण्यात आल्याचे माहे फेब्रुवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय निदर्शनास आले व तद्नुसार सदर पोलीस भरतीत आरक्षित पदांचा समावेश करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०६-२०१८) :** (१) व (२) नागपूर शहर पोलीस दलाची पोलीस शिपाई पदांची २०१३ च्या प्रमाणित बिंदुनामावली नुसार व त्यानंतर सन २०१४ च्या पोलीस भरतीत निवड झालेल्या कर्मचाऱ्यांच्या समावेश केल्यानंतर बिंदुनामावली वेळेत प्रमाणित न झाल्याने तसेच पदोन्नती झालेले, बदलीवर गेलेले, मृत्यू पावलेले स्वेच्छासेवानिवृत्त झालेले तसेच माहे डिसेंबर-२०१६ पर्यंत नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्याचा विचार करुन पूर्ण महाराष्ट्रामध्ये एकाच दिवशी जाहिरात देण्यात आल्याने फक्त खुल्या प्रवर्गात अनुशेष निघत असल्याने त्याप्रमाणे खुल्या प्रवर्गासाठी भरतीची जाहिरात देण्यात आली होती. सदरची बिंदुनामावली प्रमाणित झाल्यानंतर मागासवर्गीयांचा अनुशेष निघाल्याने सुधारीत जाहिरात प्रकाशित करुन सन २०१६ ची पोलीस भरती घेण्यात आली आहे. त्यानुसार पोलीस शिपाई पदासाठी सन २०१६ च्या पोलीस भरतीमध्ये मागासवर्गीय पदे भरण्याची कार्यवाही करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोयगाव (ता.सिल्लोड, जि.औरंगाबाद) येथे पोलीस पाटील भरती प्रक्रियेत महिला उमेदवारांना परिक्षेपासून वंचित ठेवण्यात आल्याबाबत

**(५) २०७७७ (२३-०८-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोयगाव (ता.सिल्लोड, जि.औरंगाबाद) येथे पोलीस पाटील भरती प्रक्रियेत शासन नियम बाजूला ठेवून ५० हून अधिक महिला उमेदवारांना परीक्षेपासून वंचित ठेवण्यात आल्याचे माहे मार्च, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरील प्रकरणाची चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तदनुसार सदरील प्रकरणातील दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) या संबंधात सिल्लोड उपविभाग (जि.औरंगाबाद) मध्ये एकूण १२५ पोलीस पाटील रिक्त पदाची भरती प्रक्रिया राबविण्यात आली आहे. तथापि, ५० हून अधिक महिला उमेदवारांना परिक्षेपासून वंचित ठेवल्याबाबतची बाब निदर्शनास आलेली नाही. परंतु, सिल्लोड तालुक्यातील २ महिलांनी परीक्षेस बसू न दिल्याबाबत तक्रार अर्ज सादर केले होते. त्यापैकी एक महिला अंगणवाडी सेविका असल्यामुळे व दुसऱ्या महिलेकडे आरक्षित जागेसाठी जातीचे प्रमाणपत्र अर्जासोबत जोडले नव्हते त्यामुळे या महिला उमेदवारांचे पोलीस पाटील पदासाठीचे अर्ज अपात्र ठरविण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

# मौजे डोंगरखर्डा (ता.जि.यवतमाळ) येथील आरोग्य उपकेंद्रातील वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी मुख्यालयी राहत नसल्याबाबत

**(६) २०८९२ (१९-०८-२०१६). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, श्री.अनिल भोसले, श्री.किरण पावसकर, श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे डोंगरखर्डा (ता.जि.यवतमाळ) येथे असलेल्या आरोग्य उपकेंद्रातील वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी मुख्यालयी राहत नसल्याने रुग्णांना पूर्ण क्षमतेने आरोग्य सुविधा मिळत नसल्याचे माहे मे, २०१६ च्या पहिल्या सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व आरोग्य उपकेंद्रात उपस्थित न राहणाऱ्या वैद्यकीय अधिकारी / कर्मचारी यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येतआहे,

(३) असल्यास, रुग्णांना पूर्ण क्षमतेने आरोग्य सेवा मिळावी म्हणून शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२८-०१-२०१९) :** (१) होय.

(२) व (३) सदर प्रकरणी केलेल्या चौकशीत मौजे डोंगरखर्डा या आरोग्य पथकातील वैद्यकीय अधिकारी हे मुख्यालयी मुक्कामी राहत नाही व कर्मचारी मुक्कामी राहतात असे आढळून आले.

वैद्यकीय अधिकारी यांना मुख्यालयी राहून आरोग्य सेवा देण्याबाबत ताकीद देण्यात आली आहे व कर्मचाऱ्यांना देखील मुख्यालयी राहून आरोग्य सेवा देण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अंधेरी वर्सोवा (मुंबई) परिसरातील विहिरीत उतरलेल्या दोन कामगारांचा गुदमरुन मृत्यू झाल्याबाबत

**(७) २१०५६ (२४-०८-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.रामराव वडकुते, श्री.आनंद ठाकूर, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अंधेरी-वर्सोवा (मुंबई) परिसरात नळ दुरूस्तीसाठी विहिरीत उतरलेल्या दोन कामगारांचा गुदमरुन मृत्यू झाल्याची घटना दिनांक ११ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास घडली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय निदर्शनास आले, तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) सदर घटना दिनांक १० मे, २०१६ रोजी घडलेली आहे.

(२) दिनांक १० मे, २०१६ रोजी १५.३० चे सुमारस ज्युबली अपार्टमेंट, यारी रोड, अंधेरी (प), मुंबई येथील रिंगवेलच्या (छोटी विहीर) साफसफाईचे काम करण्यास विहिरीत उतरलेल्या दोन कामगारांचा गुदमरुन मृत्यू झालेला आहे.

सुरक्षेची पुरेशी उपकरणे न पुरविता दोन कामगारांच्या मृत्यूस कारणीभूत झाल्याबाबत संबंधित ठेकेदारांविरुध्द वर्सोवा पोलीस ठाणे येथे गु.र.क्र.१७०/२०१६, भादंवि कलम ३०४ (अ) अन्वये गुन्हा नोंद करण्यात आला असून आरोपीस त्याच दिवशी अटक करण्यात आली होती. आरोपींना मा.न्यायालयाने जामीनावर मुक्त केले असून गुन्ह्याचा पुढील तपास सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील शाळा परिसरातील वाहतुक कोंडीसंदर्भात विद्यार्थ्यांसाठी "ट्रॅफिक कॉसिंग वॉर्डन" मोहिम राबविण्याबाबत

**(८) २३५२२ (०४-०१-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई शाळा परिसरातील वाहतुकीची कोंडी सोडविणेबाबत विद्यार्थ्यांसाठी "ट्रॅफिक क्रासिंग वार्डन" मोहिम माहे सप्टेंबर, २०१६ पासून राबविण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर मोहिमेमध्ये शासकीय व खाजगी शाळांचाही समावेश करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर मोहिम प्रभावीपणे राबविणेबाबत तसेच सदर मोहिमेत भाग घेणाऱ्यांचे नुकसान होवू नये म्हणून शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) होय. सदर मोहिमेमध्ये शासकीय व खाजगी शाळांचाही समावेश करण्यात आलेला आहे.

(३) "ट्रॉफिक क्रॉसिंग वार्डन" या संकल्पनेनुसार खाजगी, शासकीय अनुदानित व विनाअनुदानित शाळांमधील विद्यार्थ्यांना रस्ता सुरक्षिततेबाबत माहिती देऊन जनजागृती करण्यात येते. सदर जनजागृती कार्यक्रमात शाळेतील शिक्षक, कार्यालयीन कर्मचारी, पालक यांचा सहभाग व सहकार्य असावे याकरीता "ट्रॉफिक क्रॉसिंग वार्डन" या संकल्पनेचा उदय झाला आहे.

नेमण्यात आलेले "ट्रॉफिक क्रॉसिंग वार्डन" हे शाळेच्या परिसरात शाळा भरताना व सुटताना विद्यार्थ्यांना रस्ता ओलांडण्यास मदत करतात. तसेच शाळेतील शिक्षक, कार्यालयीन कर्मचारी, पालक हे ही मदत करीत असतात. यावेळी शाळेच्या आजूबाजूच्या परिसर वाहनमुक्त करुन त्या ठिकाणी शाळेच्या बसेस उभ्या करण्यात प्राधान्य देऊन विद्यार्थ्यांस रस्ता ओलांडण्यास मदत केली जाते.

यासंदर्भात शाळेचे मुख्याध्यापक, शिक्षक, रस्ता सुरक्षा दलाचे कर्मचारी यांच्या नावांची यादी, शाळेचे दूरध्वनी क्रमांक, वैयक्तिक मोबाईल क्रमांक, ई-मेल इ. बाबतची माहिती वाहतुक विभागामध्ये संग्रहित करण्याचे काम चालू आहे.

शाळेत मुलांच्या पी.टी. च्या तासात तसेच शाळा भरावयाच्या आधी व सुटल्यानंतर रस्ता सुरक्षेचे प्रशिक्षण विद्यार्थ्यांना देण्यात येते. वार्षिक कार्यक्रमाची आखणी वर्षाच्या सुरुवातीलाच करुन शैक्षणिक वर्ष सुरु व्हायच्या आत शाळेला कार्यक्रमाचे वेळापत्रक/अंदाजे तारखा कळविण्यात येत असतात. शाळा त्याप्रमाणे शाळेच्या वेळापत्रकामध्ये वाहतुक शिक्षण विभागातून प्राप्त कार्यक्रमानुसार शाळा आपल्या वार्षिक कार्यक्रमाचे व परिक्षांचे नियोजन/आयोजन करीत असतात. सदर अभ्यासक्रमामुळे विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर कोणताही परिणाम होत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(९) २४७०० (०४-०१-२०१६). श्री.हरिसिंग राठोड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागात गत दोन वर्षापासून अनेक पदे रिक्त असून जिल्हा आरोग्य अधिकारी माहे जून, २०१६ पासून रजेवर असल्याने प्रभारी अधिकारी काम पहात आहेत तसेच साथरोग अधिकारी नसल्याने या पदाचा भार एका वैद्यकीय अधिकाऱ्यावर सोपविण्यात आल्याचे माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पदे रिक्त असल्याने रुग्णांची गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर आरोग्य विभागातील रिक्त पदांचा आढावा घेऊन पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१५-०३-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे,

यवतमाळ जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागात महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवेमध्ये १२९ पदे मंजूर असून त्यापैकी १०४ पदे भरलेली असून २५ पदे रिक्त आहेत. यवतमाळ जिल्हा परिषद येथे कार्यरत असलेले जिल्हा आरोग्य अधिकारी हे खाजगी कारणास्तव दिनांक २२/७/२०१६ ते दिनांक ४/१०/२०१६ या कालावधीत रजेवर होते. त्यांचा अतिरिक्त कार्यभार सदर कालावधीत सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) यवतमाळ यांचेकडे सोपविण्यात आला होता.तसेच साथरोग वैद्यकीय अधिकारी यांची बदली झाल्याने त्याचे जागी दुसरा वैद्यकीय अधिकारी देण्यात आला आहे.

(२) प्राथमिक आरोग्य केंद्रातील रिक्त असलेल्या पदावर पर्यायी व्यवस्था म्हणून इतर वैद्यकीय अधिकाऱ्याकडे अतिरिक्त कार्यभार देऊन आरोग्य सेवा पुरविण्यात येत आहे. त्यामुळे रुग्णांची गैरसोय होत नाही.

(३) महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (ग्रेड पे रुपये ६६००) मधील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरु असून, जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्याबाबतची जाहिरात प्रसिध्द केली आहे. महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्यासाठी शासन निर्णय, दिनांक २६/१०/२०१६ अन्वये जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीमार्फत नियमित वैद्यकीय अधिकाऱ्याची पदे मुलाखतीव्दारे भरण्यास परवानगी देण्यात आली असून, त्यानुसार पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे. तसेच गट-क व ड संवर्गासाठी लेखीपरीक्षा घेण्यात आल्या असून रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात वायु कायदा, १९८१ अंतर्गत पर्यावरणाशी निगडीत सर्वात जास्त गुन्हे दाखल झाल्याबाबत

**(१०) २५१२० (०४-०१-२०१७). श्री.अनिल भोसले, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वायु कायदा, १९८१ अंतर्गत पर्यावरणाशी निगडीत सर्वात जास्त गुन्हे दाखल झाले आहेत अशी माहिती नॅशनल क्राईम रेकॉर्ड ब्युरोतर्फे नुकतेच जाहीर करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात चौकशी करण्यात आली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०१-२०१९) :** (१) व (२) नॅशनल क्राईम ब्युरोतर्फे प्रकाशित केलेल्या क्राईम इन इंडिया २०१६ या अहवालात हवा (प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण) अधिनियम १९८१ या शिर्षाखाली महाराष्ट्र सर्वाधिक २१ गुन्हे दाखल झाल्याची नोंद आहे. सदर गुन्हे हे मुंबई शहर (९), अहमदनगर (७), यवतमाळ (१), अमरावती शहर (४) याप्रमाणे नमूद आहे.

प्रत्यक्षात उपरोक्त सर्व गुन्हे हे हवा (प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण) अधिनियम १९८१ या सदराखाली नसून ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) कायद्याखालील आहेत. परंतु एन.सी.आर.बी. तर्फे माहिती संकलित करण्यात येणाऱ्या आज्ञावलीमध्ये ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) कायदा असा पर्याय नसल्याने गुन्ह्यांची नोंद हवा (प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण) अधिनियम १९८१ खाली करण्यात आली आहे. सबब, प्रत्यक्षात हवा (प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण) अधिनियम १९८१ अंतर्गत राज्यात एकही गुन्हा दाखल नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मतिमंद बालगृहे प्रशिक्षित तज्ञ नसल्याने महिला व बालविकास विभागाकडून सामाजिक न्याय विभागाकडे हस्तांतरित केल्याबाबत

**(११) २९०९० (१७-०४-२०१७). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बाल न्याय (काळजी व संरक्षण) अधिनियम, २००० अन्वये मतिमंद बालगृहे महिला व बालविकास विभागाच्या नियंत्रणाखाली येत होती, परंतु प्रशिक्षित तज्ञ नसल्याने ही जबाबदारी सामाजिक न्याय विभागाकडे दिनांक ३० मे, २०१२ रोजी हस्तांतरीत करण्यात आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या मुलांच्या पुनर्वसनासाठी प्रत्येक जिल्ह्यात पाच जणांची बाल कल्याण समिती असून ठाणे, रायगड व मुंबईतील जिल्ह्यातील समितीवरील काही पदे रिक्त आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतूदींप्रमाणे शिक्षण व प्रशिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन देण्याचे निर्देश मा.उच्च न्यायालयाने दिलेले असूनही मतिमंद मुलांचे पुनर्वसनाची जबाबदारी संबंधित दोन्ही विभागाने न स्वीकारण्याची कारणे काय आहेत,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने दोषी अधिकारी व कर्मचाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली आहे वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२८-०१-२०१९) :** (१) दिनांक ३० मे, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये महिला व बालविकास विभागाच्या नियंत्रणाखाली मतिमंद मुलांसाठीची बालगृहे सामाजिक न्याय विभागाला हस्तांतरीत करण्यात आलेली आहेत.
(२) बाल न्याय (काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५ अंतर्गत काळजी व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांच्या पुनर्वसनाच्या अनुषंगाने निर्णय घेण्यासाठी जिल्हास्तरावर बाल कल्याण समितीची स्थापना करणे आवश्यक आहे. ठाणे, रायगड व मुंबई जिल्ह्यातील बाल कल्याण समितीमधील रिक्त पदाचा कार्यभार इतर जिल्ह्यातील बाल कल्याण समिती सदस्यांकडे देण्यात आला असल्याने समितीचे काम सुरळीत चालेल याची दक्षता घेतली आहे.

(३) मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे अपंग व्यक्ती (समान संधी हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीप्रमाणे मतिमंद बालगृहातील प्रवेशितांना शिक्षण व प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करून देण्याकरीता १४ अनुदानित मतिमंद बालगृहांकरीता एकूण ३९३ कर्मचारी पदे (प्रशिक्षीत शिक्षक/निदेशक/शिक्षकेतर) दिनांक २२/०६/२०१५ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे मालाड (ता.बोरीवली) येथील जमिनीवरील श्री सिध्दीविनायक रायपाडा सह. गृहनिर्माण संस्था (नियो) यांचे इरादापत्र (एलओआय) रद्द करण्याबाबत

**(१२) २९८१८ (१४-०४-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे. मालाड (ता.बोरीवली) न.भू.क्रं. ७३७ या जमिनीवरील श्री.सिध्दीविनायक रायपाडा सह. गृहनिर्माण संस्था (नियो) यांचे इरादापत्र (एलओआय) रद्द करण्याबाबत लोकप्रतिनिधींनी दिनांक ६ फेब्रुवारी, २०१७ रोजीच्या पत्रान्वये मा.मुख्यमंत्री व मा.गृहनिर्माण मंत्री महोदयांकडे मागणी केली होती, हे खरे आहे काय.
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, तद्‌नुसार या प्रकरणात दोषी असलेल्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे.
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०१-०२-२०१९) :** (१) व (२) होय

याबाबत मा.श्री.आनंद राजेंद्र ठाकूर, विधानपरिषद सदस्य यांनी दिनांक ०६/०२/२०१७ च्या पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण व उपाध्यक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांच्याकडे तक्रार केली होती. सदर तक्रारीच्या अनुषंगाने झोपडपट्टी

पुनर्वसन प्राधिकरणाकडून चौकशी करण्यात आली. झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचे सहकार अधिकारी श्रेणी-२ यांच्या उपस्थितीत संस्थेच्या दिनांक ०४/०७/२०१२ रोजी झालेल्या सर्वसाधारण सभेत मंजूर परिशिष्ट-२ मधील पात्र सभासदांमधून संस्थेच्या मुख्य व इतर प्रवर्तकांची नेमणूक करण्यात आली आहे, असा झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचा अहवाल आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्हयात पीक कापणी पहाणीचा अहवाल चुकीच्या पध्दतीने केल्याबाबत

**(१३) ३०५०५ (१५-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात विशेषत: यवतमाळ जिल्हयात पीक आणेवारी काढण्यासाठी गाव पातळीवर महसूल मंडळ अधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली आणेवारी काढण्यासाठी असलेल्या समितीत तलाठी, सरपंच व पोलीस पाटलांचा समावेश असून अधिकारी प्रत्यक्ष शेतीची पाहणी करुन आणेवारीचा अहवाल काढत नसल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) तसेच सन २०१५-२०१६ या वर्षात जिल्हयात २९ हजार हेक्टर ज्वारीची पेरणी झाली असता अनेक भागात ज्वारीचे उत्पन्न एक किलो दाखविले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार ब्रिटीशकालीन आणेवारी पध्दत बंद करून अद्यावत पीक आणेवारी काढणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२२-०१-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## लोहा (जि.नांदेड) तालुक्यात चंदन चोरीच्या घटना वाढल्याबाबत

**(१४) ३०६९७ (१४-०४-२०१७). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) लोहा (जि.नांदेड) तालुक्यात स्थानिक पोलीस प्रशासनाच्या संगनमताने चंदन चोरांचे प्रमाण वाढले असल्याने सदरील बाबीवर शेतकऱ्यांत तीव्र संतापाची लाट निर्माण झाल्याची बाब माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पोलिसांची चोरांना कसल्याच प्रकारची भिती नसल्याची बाब समोर येवून शेतकऱ्यांना मात्र त्यांच्या शेतात असलेल्या चंदनांच्या झाडांना जपावे लागत असल्याची बाब ही निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.

नांदेड जिल्हयातील पोलीस स्टेशन लोहा अंतर्गत दिनांक २३/०१/२०१७ रोजी चंदनाचे झाड तोडून चोरुन घेवून जात असताना आरोपीतांना पकडून त्यांचे विरुध्द पोलीस स्टेशन लोहा जिल्हा नांदेड येथे गुरक्र. १५/२०१७ कलम ३७९ भादंवि प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर आरोपींने चोरलेले चंदनाचे लाकडे रुपये १४,९००/- इतक्या किंमतीचा माल हस्तगत करण्यात आला आहे.
(२) हे खरे नाही.

सदर प्रकरणामुळे जिल्हयातील शेतकऱ्यांना कोणतीही भिती निर्माण झालेली नाही.

(३) गुन्हातील आरोपीतांना मुद्देमाल अटक करण्यात आले आहे. सदर गुन्ह्यात करण्यात आलेल्या एकंदरीत तपासाचे निष्कर्षानुसार आरोपीविरुध्द मा.न्यायालयात दोषारोप पत्र दाखल करण्यात आले आहे.
(४) विलंब झालेला नाही.

---

## मालवण (जि.सिंधुदुर्ग) तहसिल कार्यालय परिसरात असलेल्या जनरेटरची देखभाल/ दुरुस्ती करण्याबाबत

**(१५) ३३२१४ (०५-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मालवण (जि.सिंधुदुर्ग) तहसिल कार्यालय परिसरात वीज पुरवठा बंद झाल्यानंतर उपयोगी पडणारा जनरेटर देखभाल, दुरुस्तीअभावी गेली आठ-नऊ वर्षापासून बंद असल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर जनरेटर सुस्थितीत ठेवण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-१०-२०१८) :** (१) सदर जनरेटर फक्त MSWAN प्रकल्पांकरीता स्थापित करण्यात आला होता.सदर जनरेटर MSWAN प्रकल्प लावणाऱ्या संस्थेने न वापरल्यामुळे बंद होता.
(२) जिल्हा सेतू सोसायटीमार्फत जनरेटर सुस्थितीत ठेवण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.
(३) प्रश्नच उद्भवत नाही.

---

## राज्यातील अनाथ मुलांच्या संगोपनासाठी स्थापन करण्यात आलेल्या सेवाभावी संस्थांना आर्थिक मदत मिळण्याबाबत

**(१६) ३३८५८ (१०-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) राज्यातील अनाथ मुलांच्या संगोपनासाठी काही सेवाभावी संस्था स्थापन करण्यात आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर संस्थांकडून राज्यातील अनाथ मुलांच्या संगोपनाची संपूर्ण जबाबदारी स्वीकारण्यात येते तथापि, शासनाकडून सदर संस्थांना कोणतीही आर्थिक मदत दिली जात नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर संस्थाना आर्थिक मदत देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२८-०१-२०१९) :** (१) होय.

(२) व (३) शासन मान्यताप्राप्त सेवाभावी संस्थांच्या बालगृहामध्ये नियमानुसार दाखल प्रवेशितांच्या सरासरी उपस्थितीनुसार शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०११/ प्र.क्र.४१८/का-८, दिनांक १३ सप्टेंबर, २०१३ नुसार सर्वसाधारण बालगृहांना १२१५/- तर विशेष बालगृहांना १३०५/- एवढे दरमहा दरडोई सहाय्यक अनुदान देण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील बालकांना देण्यात येणाऱ्या घरपोच आहार योजनेवर (टी.एच.आर.) जीएसटी लागू केल्याबाबत

**(१७) ३४६५८ (२९-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील बालकांना देण्यात येणाऱ्या घरपोच आहार योजनेवरही (टी.एच.आर.) केंद्र शासनाच्या जीएसटी लागू झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या करामुळे घरपोच आहार योजनेच्या वार्षिक खर्चात सुमारे २५ कोटी रुपयांची वाढ होत असून या करवाढीबाबत राज्य शासनाकडून वेळीच केंद्र शासनाला करमाफीची विनंती न केल्यामुळे ही करवाढ लागू झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर करवाढ रद्द होण्यासाठी केंद्र शासनाकडे आतापर्यंत किती वेळा (पत्राव्दारे) राज्य शासनाने पाठपुरावा केला व या पाठपुराव्यातून काय निष्पन्न झाले,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२५-०१-२०१९) :** (१) होय.
(२) घरपोच आहार योजनेसाठी ५% जी.एस.टी. लागू असून सदर जी.एस.टी. चा बोजा हा शासनावर पडणार नसून टीएचआर पुरवठाधारक संस्थांमार्फत जी.एस.टी. भरला जाणार आहे. त्यामुळे जी.एस.टी. माफ करण्याबाबत केंद्र शासनाकडे कुठलाही पत्रव्यवहार करण्यात आलेला नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई आंतरराष्ट्रीय विमानतळाच्या टर्मिनस १ ब येथे सुरु असलेल्या कामाचा राडारोडा तलावात टाकण्यात येत असल्याबाबत

**(१८) ३४६६० (१३-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई आंतरराष्ट्रीय विमानतळाच्या टर्मिनस १ ब येथे सुरु असलेल्या कामाचा राडारोडा त्या ठिकाणाहून जवळ असलेल्या तलावात टाकण्यात येत असल्याची तक्रार स्थानिकांनी बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे दिनांक २५ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सिमेंट व विटांच्या कचऱ्यामुळे या छोट्या तलावाचे अस्तित्व संपुष्टात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबतची नेमकी वस्तुस्थिती काय आहे व शासनाकडून त्याबाबत कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोलापूर जिल्ह्यातील तीर्थक्षेत्र पंढरपूर येथे गावांमध्ये सुविधा निर्माण करण्याबाबत

**(१९) ३५५०१ (०२-०१-२०१८). ॲड.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सोलापूर जिल्ह्यातील तीर्थक्षेत्र पंढरपूर येथे वर्षभरात ४ मोठ्या यात्रा भरतात या सोहळयाला दिवसेंदिवस वाढणारी गर्दी लक्षात घेवून शासनाने पंढरपूर १० कि.मी. अंतरावरील गावांमध्ये सुविधा निर्माण करण्यासाठी प्राधिकरणाची स्थापना केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्या माध्यमातून विकास आराखडा तयार करण्यात आला असून त्याची अंमलबजावणी झाल्यास त्यासाठी आरक्षणानुसार अनेकांच्या शेतजमिनी, महत्वाच्या जागा संपादित केल्या जाणार आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, बाधित होणाऱ्या शेतकऱ्यांनी या विकास आराखड्याला विरोध केला आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-०१-२०१९) :** (१) होय. शासनाने दिनांक २४/०८/२००९ रोजीच्या अधिसूचनेन्वये पंढरपूर नगर परिषद व पंढरपूर नगर परिषदेच्या हद्दीपासून १० कि.मी. अंतरामधील क्षेत्राकरीता पंढरपूर विकास प्राधिकरणाची

स्थापना केली आहे. तसेच दिनांक २५/०८/२०१० रोजीच्या अधिसूचनेद्वारे उक्त प्राधिकरणास महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ४० (१बी) अन्वये विशेष नियोजन प्राधिकरणाचा दर्जा देण्यात आलेला आहे.

(२) पंढरपूर विकास प्राधिकरणाचे हद्दीमध्ये एकूण ४१ गांवाचा समावेश असून त्यांचे एकूण क्षेत्र सुमारे ६३०.९६ चौरस कि.मी. आहे. सदरहू क्षेत्राच्या प्रारुप विकास योजनेमध्ये स्थानिक रहिवाशांच्या सोयी सुविधांकरीता तसेच वारकऱ्यांसाठी पालखी तळ, पार्किंग व इतर अनुषंगीक वापराकरीता आरक्षणे प्रस्तावित केलेली असून गरजेप्रमाणे भविष्यात या जमिनी टप्याटप्याने संपादित केल्या जातील.

(३) सदर प्रारुप विकास आराखडा प्रसिध्द केल्यानंतर या अनुषंगाने काही सूचना व हरकती सदस्य सचिव, पंढरपूर विकास प्राधिकरण तथा जिल्हाधिकारी, सोलापूर यांना प्राप्त झाल्या आहेत.

(४) सदर प्रसिध्द प्रारुप विकास योजनेसंदर्भात विहित मुदतीत प्राप्त झालेल्या सूचना/हरकती संदर्भात हरकतदारांना सुनावणी देऊन त्यांचा अहवाल प्राधिकरणाच्या सभेला सादर करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम २८ (२) अन्वये नियोजन समिती गठित करणेबाबत कार्यवाही सुरु आहे व सदर नियोजन समिती सूचना/हरकतदारांना सुनावणी देऊन त्यांचा अहवाल प्राधिकरणाच्या सभेने सुचविलेले फेरबदल दर्शवून सदर प्रारुप विकास योजना कलम ३० अन्वये शासनास मंजूरीसाठी सादर होईल.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणात गैरप्रकार होत असल्याबाबत

**(२०) ३५६७७ (०४-०१-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामनिवास सिंह, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३२६७७ ला दिनांक २६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणामधून (म्हाडा) चालणाऱ्या एका रॅकेटने आमदार कोट्यातून कमी किंमतीत फ्लॅट देण्याच्या बहाण्याने सुमारे २ कोटी ४० लाखांची फसवणूक केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी साकीनाका पोलीस ठाण्यात एका मृत व्यक्तीसह सात जणांविरोधात फसवणुकीचा गुन्हा दाखल करण्यात आला असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, फ्लॅट वितरीत करण्यासाठी थेट म्हाडाच्या कार्यालयातील म्हाडाचे लोगो असलेल्या कागदपत्रांवर हे व्यवहार करण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून दोषींवर कारवाई करून अशा प्रकारे कमी किंमतीत फ्लॅट देण्याच्या नावाने फसवणूक करणाऱ्या टोळींवर आळा घालण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१९) :** (१), (२), (३) व (४) आरोपींनी म्हाडाची घरे मिळवुन देण्याचे आमिष दाखवून बनावट व खोटे लायसन्स, पावती अलॉटमेंट पत्र व कागदपत्रांच्या प्रती देवून एकूण रुपये २,३९,९०,०००/- (दोन कोटी एकोणचाळीस लाख नव्वद हजार रुपये) फसवणूक केली असल्याचे निष्पन्न झाले आहे.

सदर प्रकरणी साकीनाका पोलीस ठाणे येथे दिनांक २/१०/२०१७ रोजी गु.र.क्र. ५५०/१७ कलम ४२०, ४१९, ४६५, ४६७, ४६८, ४७१, १२०(ब) ३४ भा.दं.वि. अन्वये एकूण ८ आरोपींविरुध्द गुन्हा नोंद करण्यात आला आहे. सदर गुन्हयातील मुख्य आरोपी मृत असून तीन आरोपींना अटक करण्यात आली आहे. सदरचा गुन्हा तपासाधिन आहे.

सदर प्रकरणी म्हाडा अधिकारी/कर्मचाऱ्यांचा सहभाग असल्याचे तपासात निष्पन्न झाले नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महानगरपालिकांच्या वृक्ष प्राधिकरणांची परवानगी घेण्याची गरज नसल्याचा कायदा प्रस्तावित केल्याबाबत

**(२१) ३५९६३ (०४-०१-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय प्राधिकरणांच्या भूखंडावरील वृक्ष तोडण्यासाठी शासनाला महानगरपालिकांच्या वृक्ष प्राधिकरणांची परवानगी घेण्याची गरज नसल्याचा कायदा करण्याचे प्रस्तावित केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रस्तावित कायद्याला सर्वच स्तरातून विरोध होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रस्तावित कायद्याचा निर्णय रद्द करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## लोकमान्यनगर बस डेपोत (जि.ठाणे) अवैधरित्या वाहन पार्किंग करीत असल्याबाबत

**(२२) ३६६४४ (०३-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लोकमान्यनगर बस डेपो (जि.ठाणे) येथे अवैधरित्या पार्किंग केले जात असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने अवैध पार्किंग करणाऱ्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

तथापि, ठाणे महानगरपालिकेने अवैध पार्किंगबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही केली आहे:-

- ठाणे महानगरपालिकेमार्फत अवैध पार्किंग करणाऱ्या खाजगी वाहनांवर जॅमर लावुन दिनांक २७/१०/२०१७ रोजी कारवाई करण्यात आली आहे.
- सद्य:स्थितीत लोकमान्य टर्मिनसमध्ये अवैधरित्या पार्किंग केले जात नाही.
- तसेच सदर ठिकाणी अवैध पार्किंग होऊ नये यासाठी ठाणे महानगरपालिकेच्या परिवहन सेवेच्यावतीने तिन्ही पाळीत सुरक्षा रक्षकांची नेमणूक करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण (जि.ठाणे) शहरातून वाहणाऱ्या वालधुनी नदीच्या संवर्धनाबाबत

**(२३) ३७६६७ (०६-०४-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.सतिश चव्हाण : दिनांक १४ डिसेंबर, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक २ मधील प्रश्न क्रमांक २८१२८ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, आयुक्त यांच्याकडून वालधुनी नदी संरक्षण व संवर्धनासाठी दिनांक १७ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास रुपये ९९७.१३ कोटींच्या खर्चासंबंधीचा अहवाल शासनास प्राप्त झाल्यानंतर शासनाकडून याप्रकरणी कोणतीही कार्यवाही केली नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्राप्त झालेल्या अहवालाच्या अनुषंगाने केंद्र शासनाचा निधी लवकरात लवकर मिळवण्यासाठी शासन केंद्र शासनाकडे किती कालावधीत प्रस्ताव सादर करणार आहे,

(३) असल्यास, अंबरनाथ तालुक्यातील उल्हास नदी आणि वालधुनी नदीतील जलप्रदूषण संपवून नदी पुनर्जिवित करण्यासाठी वालधुनी नदी प्राधिकरण स्थापन करण्यात आले असल्याचे तसेच त्यासाठी ६५० कोटी रुपयांचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, ठाणे यांचेमार्फत दिनांक ३ ऑगस्ट, २०११ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे सादर करण्यात आला असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१९) :** (१), (२) व (३) जुलै, २००५ च्या अतिवृष्टीनंतर नाशिकच्या मेरी संस्थेने वालधुनी नदीचे सर्वेक्षण करून अल्प व दीर्घकालीन उपाययोजनेबाबतचा अहवाल सन २००७ मध्ये मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास सादर केला होता.

तद्नंतर संबंधित महानगरपालिका, नगरपरिषदा यांचेमध्ये समन्वय साधून वालधुनी नदीचा विकास करण्यासाठी जिल्हाधिकारी, ठाणे यांचे अध्यक्षतेखाली सन २००८ मध्ये समन्वय समिती स्थापन करण्यात आली.

सदर समन्वय समितीने त्यांचा प्रकल्प अहवाल सन २०११ मध्ये नवी-१२, नगरविकास यांना सादर केला. मंत्रालयास दिनांक २१/०६/२०१२ रोजी लागलेल्या आगीत सदर कार्यासनाचा संपूर्ण अभिलेख जळून नष्ट झाला आहे.

वालधुनी नदीच्या संवर्धनाकरीता करण्यात आलेल्या प्रकल्प अहवालाचा तपशील पुढीलप्रमाणे असल्याचे कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने त्यांच्या पत्रात नमूद केले आहे.

| अ.क्र. | मनपा/नगरपरिषद | प्रकल्पाची किंमत (कोटी) २००८-०९ च्या दरसूचीनुसार | प्रकल्पाची किंमत (कोटी) २०१५-१६ च्या दरसूचीनुसार |
|---|---|---|---|
| १ | कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्र | १९३.७५ | ३७७.८१ |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | उल्हासनगर महानगरपालिका क्षेत्र | २०४.८५ | ३९९.४६ |
| ३ | अंबरनाथ नगरपरिषद क्षेत्र | ११२.७५ | २१९.८६ |
| | **एकूण** | **५११.३५** | **९९७.१३** |

दिनांक २२/०६/२०१५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये वालधुनी नदी संदर्भातील संदर्भ त्या त्या स्थानिक नागरी संस्थेने हाताळण्याचे निर्देश दिले आहेत.

वालधुनी नदी संवर्धनाबाबत केंद्र शासनाकडे निधीसाठी प्रस्ताव सादर करण्यात आलेला नाही, ही वस्तुस्थिती आहे.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मेघवाडी (जोगेश्वरी) येथील पोलीस उपनिरीक्षकावर लाच स्वीकारल्याप्रकरणी कारवाई करणेबाबत

**(२४) ३७९४२ (०६-०४-२०१८). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील मेघवाडी (जोगेश्वरी) येथील पोलीस उपनिरीक्षक संदिप बढे यास लाचलुचपत प्रतिबंधक विभागाच्या अधिकाऱ्यांनी दिनांक ७ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास १० हजार रुपयांची लाच स्वीकारताना अटक केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार संबंधिताविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१), (२) व (३) होय.

मुंबईतील मेघवाडी (जोगेश्वरी) येथील पोलीस ठाण्यातील संदिप राणुजी बढे यांनी फिर्यादी अन्सार मोहम्मद यांचेविरुध्द दाखल गुन्हा नोंद

क्र. ३२५/२०१७ कलम - ३२६ भादंवि या गुन्हयात कलम - ३०७ भादंवि या कलमाची वाढ करुन कठोर कारवाई न करण्याकरीता ३०,०००/- लाचेची मागणी करुन सापळा कारवाई दरम्यान रुपये १०,०००/- लाचेची रक्कम स्विकारली म्हणुन आरोपी लोकसेवक पोलीस उपनिरीक्षक संदिप राणुजी बढे यांचेविरूध्द दिनांक ०७/०१/२०१८ रोजी गु.र.क्र. ०१/१८५ कलम-७,१३ (१)(ड) सह १३(२) भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम, १९८८ अन्वये गुन्हा नोंद करुन नमुद गुन्हयात अटक करण्यात आलेली असून सदर गुन्हयांचा पुढील तपास चालू आहे.

---

## राज्यातील सफाई कामगार तथा मेहत्तर वाल्मिकी समाजाच्या प्रलंबित मागण्यांबाबत

**(२५) ३८११९ (०६-०४-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सफाई कामगार तथा मेहत्तर वाल्मिकी समाजाच्या प्रलंबित मागण्यांसंदर्भात अखिल भारतीय सफाई मजदूर संघटनेने तसेच लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री, मा.नगरविकास राज्यमंत्री, मुख्य सचिव, प्रधान सचिव, नगरविकास विभाग तसेच आयुक्त, नगरपालिका प्रशासन यांना सन २०१६ व सन २०१७ मध्ये वा त्यादरम्यान सातत्याने निवेदने देऊनही त्याबाबत कोणतीही कार्यवाही झालेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाने जळगाव महापालिकेच्या ५२३ सफाई कामगारांच्या जागा व्यपगत केलेल्या आहेत त्याचप्रमाणे राज्यातील नगरपालिका, महानगरपालिका मधील सफाई कामगारांच्या व्यपगत झालेल्या जागा तात्काळ पुनर्जिवित करुन मंजूर झालेल्या जागा भरतीबाबत शासनस्तरावर निर्णय घेण्यात आला आहे काय,

(३) असल्यास, सफाई कामगार तथा मेहतर वाल्मिकी समाजाच्या प्रलंबित सोडविण्याच्यादृष्टीने शासनस्तरावर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०१-२०१९) :** (१), (२) व (३) प्रदेशाध्यक्ष, महाराष्ट्र मुस्लिम मेहत्तर सफाई कर्मचारी संघटना, लातूर यांचे निवेदन प्राप्त झाले आहे. जळगांव महानगरपालिकेच्या ५२३ सफाई कामगारांची पदे पुनर्जिवित करण्याच्या प्रस्ताव शासनाने दिनांक १५/११/२००७ रोजी अमान्य केला आहे. तसेच इतर मनपा बाबत पदे पुनर्जिवित करण्याचा कोणताही प्रस्ताव झाला नसल्याचे उपलब्ध अभिलेखावरुन दिसून येते.

सफाई कामगारांच्या मागण्यांबाबत शासनस्तरावर सफाई कामगारांच्या संघटनेच्या प्रतिनिधीसमवेत वारंवार बैठका घेण्यात येवून, सफाई कामगारांचे प्रश्न सकारात्मकदृष्टया सोडविण्याचे प्रयत्न करण्यात येत असतात.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आर्णी (जि.यवतमाळ) नगरपरिषदेच्या नवीन इमारत बांधकामाबाबत

**(२६) ३८२९५ (०६-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर : दिनांक २ ऑगस्ट, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ३ मधील प्रश्न क्रमांक २९४८९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर्णी (जि.यवतमाळ) नगरपरिषद ही “ड” वर्ग दर्जाची नगरपरिषद आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर नगरपरिषदेचे आर्थिक उत्पन्न ही फारच कमी आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, आर्णी नगरपरिषदेचे कार्यालय जुन्या इमारतीमध्ये व अपुऱ्या जागेत असल्याने नवीन इमारत बांधकामाकरीता स्थानिक लोकप्रतिनिधीने शासनाच्या वित्त विभागाकडे निधीची मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१८) :** (१) आर्णी नगरपरिषदेची सन २०११ च्या जनगणनेनुसार लोकसंख्या ३१,५९७ इतकी असून सदर नगरपरिषद “क” वर्ग दर्जाची आहे.

(२) सदर नगरपरिषदेचे स्वत:चे वार्षिक आर्थिक उत्पन्न साधारणपणे १ कोटी १० लाख इतके आहे.

(३) व (४) नगरपरिषदेचे कार्यालय सध्या तत्कालीन ग्रामपंचायतीच्या इमारतीमध्ये असून काही विभाग सदर इमारतीपासून ८०० मीटर अंतरावर असलेल्या जुन्या इमारतीमध्ये कार्यरत आहेत.

सदर इमारतीची जागा कार्यालय / सभागृह / कर्मचाऱ्यांकरीता अपूरी पडत असल्याने नगर परिषदेने दिनांक ३१/७/२०१८ रोजी ठराव पारित केला असून पाण्याच्या टाकीजवळील नगरपरिषदेची जागा किंवा जिल्हा परिषद बांधकाम उपविभाग, आर्णी कार्यालयाची जागा किंवा सरकारी गोडावूनची जागा किंवा सध्या कार्यरत असलेली जागा यावर इमारत बांधकामाचा प्रस्ताव विचारात घ्यावा, असा ठराव पारित केला आहे.

नगरपरिषदेने अद्याप इमारतीसाठी जागेची निश्चिती केलेली नाही.

नगरपरिषदेला मिळणाऱ्या १४ व्या वित्त आयोगाच्या मूलभूत बाबींची पूर्तता झाल्यावर उर्वरित अनुदानातून तसेच स्व:निधीतून सदर इमारतीचे बांधकाम करता येईल.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिकेच्या मालकीच्या भूखंडावर इमारतींचा पुनर्विकास करताना विकासकांनी प्रिमियम थकविल्याबाबत

**(२७) ३८३१३ (०६-०४-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५७७१ ला दिनांक २० डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिकेच्या मालकीच्या भूखंडावर इमारतींचा पुनर्विकास करताना महानगरपालिकेला प्रिमियम पोटी भरावयाचे ३५७ कोटी ८४ लाख रुपये १८ विकासकांनी भरल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मुंबई महानगरपालिकेने विकास नियंत्रण नियमावली अधिनियमन ३३(७) अंतर्गत मंजूर केलेल्या १८ प्रकल्पांबाबत संबंधित विकासकाद्वारे इमारतीचे बांधकाम अपेक्षित कालावधीत पूर्ण केलेले नाही तसेच प्रिमियम रक्कम देखील भरलेली नाही अशा विकासकांवर स्टॉप वर्क नोटीस बजावली असल्याची बाब माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, निर्धारीत वेळेत प्रकल्प पूर्ण करणे बंधनकारक असताना विकासकांकडून अटींचे उल्लंघन झाल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार विकासकांकडून थकीत प्रिमियम वसुल करणे व निर्धारीत वेळेत प्रकल्प पूर्ण करण्याबाबत काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१९)** : (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या मालमत्ता विभागाच्या भूभागावरील भाडेकरु मालमत्तांवर एकूण १२४ पुनर्विकास प्रकल्पांस विकास नियंत्रण नियमावली ३३(७) व ३ पुनर्विकास प्रकल्पांस विकास नियंत्रण नियमावली ३३(९) अन्वये पुनर्विकास करण्याकरीता मंजुरी देण्यात आली आहे.

सदर १२७ पुनर्विकास प्रकल्पांपैकी ३५ प्रकल्पांमध्ये भांडवली मूल्य निरंक आहे व २ प्रकल्पांचे इरादापत्र रद्द केल्याचे विकासकास कळविण्यात आले आहे.

उर्वरित ९० प्रकल्पांमधून महानगरपालिकेस माहे ऑक्टोबर, २०१८ पर्यंत रुपये ८६६.५५ कोटी इतकी रक्कम टप्प्याटप्प्याने प्राप्त झाली असून, सदर प्रकल्प विविधस्तरावर कार्यरत असल्याने उर्वरित ३७८.६१ कोटी इतकी

रक्कम टप्प्याटप्प्यानुसार प्राप्त होणार आसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(२) महानगरपालिकेच्या मालमत्ता विभागाच्या जमिनीवरील विविध कालावधी संपुष्टात आलेले व इरादापत्राच्या अटी/शर्ती पूर्ण न केलेल्या अशा १९ पुनर्विकास प्रकल्पांच्या विकासकांवर कारणे दाखवा नोटीसा बजावण्यात आल्या असून, बांधकाम स्थगित करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

सदर पुनर्विकास प्रकल्प पूर्णत्वास नेण्याकरीता येणाऱ्या विविध बाबींच्या अनुषंगाने प्रकल्प कालावधी वाढविण्याच्या अनुषंगाने महानगरपालिकेस सादर केलेल्या १६ विनंती अर्जांपैकी १४ पुनर्विकास प्रकल्पांची छाननी करुन प्रकल्प कालावधी वाढविण्यास महानगरपालिकेमार्फत मंजुरी देण्यात आली होती. परंतु संबंधित विकासकांनी भांडवली मुल्याचा भरणा केलेला नाही.

सदर १९ पुनर्विकास प्रकल्पांपैकी २ प्रकल्पांच्या विकासकाची नियुक्ती रद्द करण्यात आली आहेत. तसेच, ३ प्रकल्प हे शासनाच्या जमिनीवर असून, त्यांच मक्ता कालावधी संपुष्टात आल्याने मक्ता नुतनीकरणाची कार्यवाही सुरु असल्याचे महानगरपालिकमार्फत कळविण्यात आले आहे.

(३), (४) व (५) भोईवाडा गांव, परेल येथील महानगरपालिकेच्या भूखंडावर नागरी नुतनीकरण योजनेंतर्गत विकास नियंत्रण नियमावली ३३(९) अन्वये राबविण्यात येणाऱ्या प्रकल्पातील कंत्राटदार/विकासक मे. विघ्नहर्ता बिल्डर्स आणि प्रोजेक्टस प्रा.लि. यांनी पुनर्विकास प्रकल्पास केलेल्या विलंबाबाबत तसेच महानगरपालिकेचा महसूल न दिल्याबाबत त्यांची नियुक्ती रद्द करण्यात आली असून, सदर कारवाईस कंत्राटदाराने मा.उच्च न्यायालयात याचिका क्रमांक नोटीस ऑफ मोशन (एल) १४/२०१६ इन कॉमन सुट (एल) ९२/२०१६ अन्वये आव्हान दिले आहे. सदर प्रकल्पाकरीता ई-टेंडरिंगची कार्यवाही सुरु आहे.

दादर नायगांव येथील सी.एस.क्र. २५ येथील धरती सहकारी गृहनिर्माण संस्था या पुनर्विकास प्रकल्पाचे इरादापत्र रद्दबातल केले असल्याने, विकासक मे. ओम शांती हाऊसिंग यांनी शिल्लक ९०% भांडवली मुल्यावरील १८% व्याज आकारणी केल्याबद्दल मा.उच्च न्यायालयात याचिका क्रमांक ११०/२०१८ दाखल केली आहे.

सी.एस. क्रमांक ७४, नायगांव विभाग, सुपारीबाग स्कीम क्रमांक ३१ आणि प्लॉट क्रमांक १५५ ते १५७ आणि १५९ ते १६२, परेल विभाग येथील गणेश लीला सहकारी गृहनिर्माण संस्था या पुनर्विकास योजनेचे विकासक मे. प्रार्थन इंटरप्रायजेस यांनी शिल्लक ९०% भांडवली मुल्यावरील १८% व्याज आकारणी केल्याबद्दल मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल केली आहे.

उपरोक्त सर्व प्रकरणी मा.न्यायालयाच्या आदेशानुसार पुढील कार्यवाही करण्यात येणार असल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

---

## मुंबई महापालिकेतील अभियंत्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२८) ३८६१५ (०६-०४-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामनिवास सिंह, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महापालिकेतील अभियंत्यांची बहुतांश पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यामध्ये रस्ते आणि बांधकाम ही कामे पाहणाऱ्या नगरविकास विभागातील कनिष्ठ अभियंत्यांच्या ८०० पैकी २५० जागा रिक्त असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, रस्ते विभागातील रिक्त १६९ जागांपैकी १२५ जागा भरण्याची मागणी मागणी मंजूर होऊनही ह्या जागा भरण्यात न आल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार रिक्त पदे भरून रस्ते विकासाच्या कामाला गती येण्यासाठी महापालिकेला निर्देश देण्यासंदर्भात कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) व (२) बृहन्मुंबई महानगरपालिकेतील विविध आस्थापनांवरील अभियंत्यांच्या पदाचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| संवर्ग | एकूण पदे | भरलेली पदे | रिक्त पदे |
|---|---|---|---|
| कनिष्ठ अभियंता (स्था) | ८४२ | ५७८ | २६४ |
| दुय्यम अभियंता (स्था) | १६६४ | १४२३ | २४१ |

(३), (४) व (५) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या रस्ते विभागात दुय्यम अभियंता (स्थापत्य) संवर्गाची अनुसूचित व अनअनुसूचित अशी एकूण ३२१ पदे असून, त्यापैकी २८३ पदे भरली आहेत व ३८ पदे रिक्त आहेत.

तथापि, प्रमुख अभियंता (रस्ते) यांच्या मागणीनुसार, अभियंत्यांची १६० पदे समायोजन करुन भरण्यास आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांची मंजुरी प्राप्त झाली असून पुढील कार्यवाही महानगरपालिकेमार्फत करण्यात येत आहे.

---

## चेंबूर (मुंबई) येथील अयोध्यानगर परिसरात शौचालय बांधण्याबाबत

**(२९) ३८९९२ (०६-०४-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चेंबूर (मुंबई) येथील अयोध्यानगर परिसरात असलेल्या नवीन शौचालयाची अज्ञात व्यक्तीकडून जाळपोळ करण्यात आल्यामुळे तेथील नागरीकांची शौचालयाविना गैरसोय होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागरिकांची होत असलेली गैरसोय सोडविण्यासाठी सदरहू ठिकाणी शौचालय बांधण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) सदर ठिकाणी शौचालय बांधण्याकरीता कंत्राटदार नियुक्त करण्याचे काम सुरु असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

---

## मुंबई महापालिकेच्या शाळांच्या साफ सफाईकडे दुर्लक्ष करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कार्यवाही करण्याबाबत

**(३०) ३९००९ (०६-०४-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील दादर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या महापरिनिर्वाण दिनानिमित्त दिनांक ६ डिसेंबर, २०१७ रोजी आलेल्या भाविकांची पाऊस व ओखी वादळामुळे दादरमधील काही शाळांमध्ये सोय करण्यात आली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, दुसऱ्या दिवशी महापालिकेच्या अधिकाऱ्यांनी तेथील अस्वच्छता दूर करण्यासाठी लक्ष न दिल्याने तेथील विद्यार्थी व शिक्षकांना सफाईचे काम करावे लागले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, यासंदर्भात शासनाने चौकशी करुन या शाळांच्या साफ सफाईकडे दुर्लक्ष करणाऱ्या महानगरपालिका अधिकाऱ्यांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१९) :** (१) दिनांक ०६/१२/२०१७ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या महापरिनिर्वाण दिनी आलेल्या ओखी वादळामुळे अनुयायांची होणारी गैरसोय लक्षात घेता, महानगरपालिकेच्या जी/उत्तर विभाग कार्यालयांतर्गत असलेल्या ८ शालेय इमारतींमध्ये अनुयायांच्या तात्पुरत्या निवाऱ्याची सोय करण्यात आली होती.

(२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या जी/उत्तर विभागातील १७ एन.जी.ओ. मार्फत १५० कर्मचाऱ्यांच्या मदतीने शाळा स्वच्छतेचे काम करुन घेण्यात आल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील वन विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(३१) ३९०७९ (०४-०४-२०१८). डॉ.परिणय फुके, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३५४४५ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात गेल्या वर्षी २२ वाघांचा मृत्यू झाल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले तसेच पर्यटन आणि इतरही कामाचा बोजा वन विभागाच्या क्षेत्रिय कर्मचाऱ्यांवर वाढल्याने वन व वन्यजीव संवर्धनाकडे दुर्लक्ष होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील वन विभागात विविध संवर्गातील २२०१ पदे रिक्त असून यात भारतीय वन सेवेतील ५ तसेच क्षेत्रिय वन अधिकाऱ्यांच्याही अनेक पदांचा समावेश आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्य शासनाने व्याघ्रदूत म्हणून ‘बिग बी’ अमिताभ बच्चन यांची वाघ संवर्धनाच्या जनजागृतीसाठी वापर करणे अपेक्षित असतानाही वन विभागास अपयश आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, राज्यात वन विभागाचे प्रादेशिक ११ वनवृत्त तर वन्यजीव विभागाचे ९ वनवृत्त असून जंगल वन्यजीवांच्या संरक्षणाची जबाबदारी सांभाळणाऱ्या वनपाल, वनरक्षक व वनपरिक्षेत्राधिकाऱ्यांची सुमारे ९७० पदे रिक्त आहेत, हे ही खरे आहे काय,
(५) तसेच, राज्यातील वन विभागात सप्टेंबर, २०१७ अखेर रिक्त असलेल्या २२०१ पदांचे पार्श्वभुमीवर वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २/६/२०१५ व दिनांक १५/१/२०१६ मधील रिक्त पदे भरण्याच्या निर्बंधास अनुलक्षून क्षेत्रियस्तरावरील सहाय्यक वनसंरक्षक, वनक्षेत्रपाल, वनरक्षक, लेखापाल व लिपिक या संवर्गातील दरवर्षी रिक्त होणारी पदे पुढील तीन वर्ष १०० टक्के

भरण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सामान्य प्रशासन / वित्त विभागास सादर करण्यात आला, हे ही खरे आहे काय,

(६) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (३०-०१-२०१९) :** (१) होय, हे अंशतः खरे आहे.

मागील वर्षात राज्यात २२ वाघांचा मृत्यू झालेला आहे. त्यात ४ वाघांच्या बछड्यांचा समावेश आहे. वन व वन्यजीव संवर्धनाबाबत उपाययोजना केली जात असल्याने पर्यटन आणि इतरही कामाचा बोझा वनविभागाच्या क्षेत्रिय कर्मचाऱ्यांवर वाढल्याने वन व वन्यजीव संवर्धनाकडे दुर्लक्ष होत आहे, असे म्हणणे संयुक्तीक ठरत नाही.

(२) हे खरे आहे.

माहे सप्टेंबर, २०१७ अखेर वन विभागातील २२३४ पदे रिक्त होती. तथापि, मार्च, २०१८ अखरेच्या अहवालानुसार २२०३ पदे रिक्त आहे. भारतीय वन सेवा संवर्गातील मुख्य वनसंरक्षक -८ व वनसंरक्षक-४ व उपवनसंरक्षक-१ अशी एकूण १३ पदे रिक्त आहेत.

(३) हे खरे नाही.

(४) वन विभागांतर्गत मार्च-२०१८ अखेर वनक्षेत्रपाल, वनपाल व वनरक्षक यांची एकूण ९०५ पदे रिक्त आहेत.

(५) सहाय्यक वनसंरक्षक, वनक्षेत्रपाल, वनसंरक्षक व सर्वेक्षक या संवर्गातील दर वर्षी रिक्त होणाऱ्या पदांच्या १०० टक्के पदभरती दोन वर्ष करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला आहे.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माथेरान (ता.कर्जत, जि.रायगड) येथे अंगणवाड्यातील बालकांना वेळेवर पोषण आहार मिळण्याबाबत

**(३२) ३९९९१ (०४-०४-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माथेरान (ता.कर्जत, जि.रायगड) येथे शासनाच्या योजनेतून चालविण्यात येत असलेल्या अंगणवाड्यातील बालकांना पोषण आहार शासनाकडून दिला जातो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अंगणवाड्यातील बालकांना पोषण आहार पोहोचविण्याची जबाबदारी एकात्मिक बालविकास विभागाची आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, माहे डिसेंबर, २०१७ च्या शेवटच्या आठवड्यात अंगणवाडीतील बालकांना पुरविण्यात आलेल्या पोषण आहाराच्या पाकिटाची मुदत संपण्याचा कालावधी माहे डिसेंबर, २०१७ होता, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने संबंधित दोषींवर कारवाई करुन अंगणवाडीतील बालकांना वेळेवर पोषण आहार मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०१-०२-२०१९) :** (१) होय.

(२) होय.

(३) होय.

(४) सदर प्रकरणी बालविकास प्रकल्प अधिकारी, रत्नागिरी यांनी माथेरान येथील अंगणवाड्यांना भेट देवून चौकशी केली. चौकशीत सदर आहाराचा कालावधी मुदतबाहय झाला नव्हता. तथापि, सदर आहाराचा पुरवठा पुरवठाधारकाने उशिराने केलेला आहे. उशिराने आहाराचा पुरवठा केल्याबद्दल संबंधित पुरवठाधारकाला कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली असून उशिरा पुरवठा केल्याबद्दल संबंधित संस्थेवर निविदा अटी शर्तीनुसार दंडात्मक कार्यवाही करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई शहरातील पुलाखालील रिकाम्या जागेचा वापर उद्यानांसाठी करण्याबाबत

**(३३) ४००७६ (०६-०४-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मा.मुंबई उच्च न्यायालयाने शहरातील पुलाखालील रिकाम्या जागेचा वापर उद्यानांसाठी करण्यात यावा असे आदेश मुंबई महानगरपालिकेला दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दादर (पूर्व) येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर मार्गावरील जगन्नाथ शंकर शेठ पुलाखालील जागेचे सुशोभिकरण करण्याऐवजी महापालिकेच्या एफ दक्षिण विभागाच्यावतीने सदर जागा शहरातील पेव्हर ब्लॉकच्या डेब्रिजसाठी वापरण्यात येत असल्याने मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाचा अवमान करून महानगरपालिका उद्यानाच्या संरक्षित जागेला डंम्पिंग ग्राऊंड बनवत असल्याने स्थानिक रहिवाशांकडून संताप व्यक्त करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शहरातील उद्यानांची जागा शाळा तसेच विविध संस्थांकडून हडप केली जात आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदरहू पूलाखालील जागेचे सुशोभिकरण करण्याऐवजी मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाचा अवमान करून सदर जागा शहरातील पेव्हर ब्लॉकच्या डेब्रिजसाठी वापरण्याची कारणे काय आहेत,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून याप्रकरणी संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करून त्यांचेविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१९) :** (१) मा.उच्च न्यायालयाने जनहित याचिका क्रमांक १००/२०१५ व जनहित याचिका क्रमांक १८/२०१४ मध्ये अनुक्रमे दिनांक ०८/०२/२०१६ व दिनांक ०८/०६/२०१७ रोजी दिलेल्या आदेशान्वये, शहरातील पुलाखालील जागा “नो पार्किंग झोन” करण्याबाबत आदेश दिले आहेत.

(२), (३) व (४) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या एफ/दक्षिण विभागातील परेल येथील संत शिरोमणी नामदेव महाराज उड्डाणपुलाच्या पुनर्पुष्ठीकरणाच्या कामावेळी निघालेले चांगले पेव्हर ब्लॉक तात्पुरत्या कालावधीसाठी नाना शंकरशेठ पुलाखालील मोकळया जागेत ठेवण्यात आले होते. सदर काम पूर्ण होताच सदर पेव्हर ब्लॉक महानगरपालिकेमार्फत उचलण्यात आले आहेत.

सद्य:स्थितीत सदर पुलाखाली कोणत्याही प्रकारचे डेब्रिज अथवा पेव्हर ब्लॉक ठेवण्यात आले नसल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(५) सदर प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत चौकशी करण्यात आलेली नाही.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात पोलीस भरती करण्याबाबत

**(३४) ४०२६८ (०६-०४-२०१८). डॉ.परिणय फुके** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील पोलीस कर्मचाऱ्यांचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान कामाचे आठ तास करण्याचे ठरविण्यात आल्यामुळे पोलीस कर्मचाऱ्यांमध्ये चैतन्याचे वातावरण पसरले असून कामाचा ताण कमी करण्याच्यादृष्टीने शासनाने योग्य पाऊल उचलले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात सन २०१८-२०१९ या वर्षात महापोलीस भरती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त पोलीस भरतीबाबत शासनाकडून केव्हा जाहिरात देण्यात येणार आहे,

(४) असल्यास, सदरहू महापोलीस भरती झाल्यास पोलीस कर्मचाऱ्यांवरील कामाचा ताण कमी होण्यास मदत होणार असून याबाबत शासनाची भूमिका काय असणार आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२४-०१-२०१९) :** (१) मुंबई शहरातील पोलीस कर्मचाऱ्यांना ८ तास कर्तव्ये देण्यात आलेली आहेत.
(२) दिनांक ३१/१२/२०१८ पर्यंत राज्यातील पोलीस शिपाई संवर्गात ५९७९ पदे रिक्त होणार असून सदरहू सर्व पदे भरण्यास दिनांक ०५/०२/२०१८ च्या पत्रान्वये शासनाची मान्यता देण्यात आलेली आहे.
(३), (४) व (५) पोलीस शिपाई भरती सन २०१८ ची प्रक्रिया ४७ पोलीस घटकात सुरु करण्यात आली असून दिनांक ०५/०२/२०१८ रोजी जाहिरात देण्यात आली आहे.

---

## औरंगाबाद येथील शासकीय कर्करोग रुग्णालयातील समस्याबाबत

**(३५) ४१६१८ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८०३० ला दिनांक १३ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद येथील कनिष्ठ निवासी १, २ व ३ या संवर्गाच्या ७२ पदासाठी शासन निर्णय दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८ नुसार विद्यावेतनाप्रमाणे वेतन अदा करण्यास मंजुरी देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कर्करोग रुग्णालयातील कनिष्ठ निवासी संवर्गातील ७२ पदे भरण्याची कार्यवाही पूर्ण झाली आहे काय, तसेच रुग्णालयातील समस्यांबाबत तोडगा काढण्यासाठी अधिवेशन काळात बैठक घेण्याचे आश्वासन मा.राज्यमंत्री, वैद्यकीय शिक्षण यांनी दिनांक ८ मार्च, २०१८ रोजी विधान परिषदेत दिले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, कर्करोग रुग्णालयातील रिसर्च फेलो या पदाचे सेवा प्रवेश, नियम, कर्तव्य व जबाबदाऱ्या निश्चित करण्याची कार्यवाही पूर्ण झाली असल्यास सदरची २४ पदे केव्हा भरली जाणार आहेत,
(४) रुग्णालयातील रेडियेशन सारख्या उपचारासाठी लागणारा प्रतिक्षा कालावधी कमी करण्यासाठी भाभा ट्रान - २ हे यंत्र स्थापन करण्याची कार्यवाही केव्हा पूर्ण होणार आहे,

(५) असल्यास, शासकीय कर्करोग रूग्णालयामार्फत मराठवाडा व महाराष्ट्राच्या विविध गावांमध्ये महाआरोग्य शिबिराचे उपक्रम राबविले जात असतील तर या उपक्रमाचा मागील दोन वर्षांचा तपशील काय आहे, या उपक्रमातून प्राथमिक अवस्थेतील किती कर्करोग रुग्णांचा शोध या निमित्ताने लागला आहे,

(६) राज्यात कर्करोग संस्था म्हणून दर्जा प्राप्त झाल्यामुळे आवश्यक साधन सामग्री व बांधकामे आदी बाबी विहित मुदतीत पूर्ण करण्याबाबत तसेच तज्ञांच्या शिफारशीसह नवीन औषधाचा पुरवठा करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२५-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर पदे भरण्याची कार्यवाही संस्थास्तरावर सुरु आहे.

'शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद येथील असुविधांमुळे व रिक्त पदांमुळे रुग्णांचे होणारे अतोनात हाल' या विषयावरील दिनांक ०८/०३/२०१८ रोजी उपस्थित अल्पकालीन चर्चेप्रसंगी रिक्त पदांच्या भरतीच्या अनुषंगाने अधिवेशन कालावधीमध्ये बैठक आयोजित करण्यासंदर्भात मा.राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांनी भाष्य केले होते.

(३) रिसर्च फेलो पदावर नियुक्त्या देण्याबाबतचे धोरण अंतिम करण्याची कार्यवाही शासनस्तरावरुन करण्यात येत आहे. सदर कार्यवाहीनंतर या संवर्गातील पदे भरण्याची कार्यवाही करण्यात येणार आहे.

(४) भाभा ट्रॉन-२ हे यंत्र दिनांक २७/०७/२०१८ रोजी रुग्ण सेवेकरीता कार्यान्वित करण्यात आले आहे.

(५) महाराष्ट्राच्या विविध भागामध्ये राबविण्यात आलेल्या शिबिरामध्ये शासकीय कर्करोग रुग्णालयाने मागील दोन वर्षामध्ये नंदुरबार, किनवट, उस्मानाबाद, राळेगणसिध्दी, मावळ, पाचोरा, जामनेर, फैजपूर, फुलंब्री, लासूर व नाशिक इत्यादी ठिकाणी महाआरोग्य शिबिरामध्ये १७६ संशयित रुग्णांना पुढील तपासणी व निदानासाठी संदर्भित करण्यात आले होते. त्यापैकी या रुग्णालयामध्ये प्राथमिक अवस्थेतील १५ रुग्णांमध्ये कर्करोगाचे निदान करण्यात आले असून त्यांना उपचार देण्यात आले आहेत.

(६) शासनाने शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालयास राज्य कर्करोग संस्थेचा दर्जा प्रदान केला आहे. उक्त संस्थेसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात एकूण रुपये ४६,३७,६३,५६३/- इतक्या किंमतीच्या यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सदर संस्थेच्या बांधकामासाठी रुपये ३१,०७,४६,०००/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. सदर बांधकामासाठी केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटंब कल्याण विभागाच्या नियंत्रणाखालील सार्वजनिक उपक्रम कंपनी असलेल्या एचएससीसी (इंडिया) लिमिटेड या कंपनीशी सामंजस्य करार करण्यात आलेला आहे. जीवनावश्यक औषधाची खरेदीसाठी हाफकीन बायो फार्मास्युटीकल महामंडळ मर्यादित, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात आले असून सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयासाठी लागणारी औषधांची खरेदी प्रक्रिया त्यांच्यामार्फत राबविण्यात येत आहे.

---

## पुणे शहरातील पीएमपी बस अपघातात खाजगी ठेकेदारांच्या बसने अपघात होऊन मृत पावलेल्यांच्या संख्येत वाढ झाल्याबाबत

**(३६) ४२४४० (०२-०८-२०१८). श्री.अनिल भोसले** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरातील पीएमपी बस अपघातात खाजगी ठेकेदारांच्या बसने अपघात होऊन मृत पावलेल्या संख्येत वाढ झाल्याची बाब माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तदनुसार अपघातांकडे अक्षम्य दुर्लक्ष करणाऱ्या पीएमपी प्रशासनावर व संबंधित बस ठेकेदारांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) व (२) खाजगी ठेकेदाराकडील बसला सन २०१७-२०१८ या कालावधीत काही प्रमाणात अपघात झालेले आहेत. त्यातील एक बस चालक दोषी आढळला नसून अपघातातील दोषी असलेल्या दोन खाजगी बस चालकांना ठेकेदारांनी सेवेतून बडतर्फ केले आहे.

आजपर्यंत पुणे महानगर परिवहन महामंडळाच्या भाडेतत्वावरील बसेसना झालेल्या अपघातातील अपघातग्रस्त व्यक्तींना संबंधित भाडेतत्वावरील एजन्सीने आर्थिक मदत केलेली आहे.

पुणे महानगर परिवहन महामंडळाच्या बसेसना अपघात होवू नये म्हणून सर्व चालक सेवकांना सेवापर्व तसेच सेवेत प्रवेश केल्यानंतर कालबध्द प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येतो.

महामंडळाच्या बसेसना आग लागू नये म्हणून दैनंदिन देखभाल दशदिनी देखभाल व त्रैमासिक देखभाल, करतांना सर्व बसेस मध्ये इलेक्ट्रीकल सिस्टिमची तपासणी कुशल कर्मचाऱ्यांकडून करण्यात येते व आवश्यक ती दक्षता घेतली जाते.

तसेच प्राणांतिक, गंभीर तसेच किरकोळ अपघाताकरीता दोषी असलेल्या चालकांवर खातेनिहाय कारवाई करुन संबंधित चालकांना सेवेतून बडतर्फे करणे पर्यंतची कारवाई करण्यात येते.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईत बेस्ट परिवहन विभागाने स्मार्ट कार्ड योजना बंद केल्याबाबत

**(३७) ४२५४४ (०२-०८-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत बेस्ट प्रवाशांच्या सोयीसाठी व प्रवाशांना आकर्षित करण्यासाठी सुरु केलेली स्मार्ट कार्ड योजना बेस्ट परिवहन विभागाने बंद केल्यामुळे स्मार्ट कार्ड खरेदी केलेल्या प्रवाशांचे पैसे वाया गेल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार प्रवाशांच्या पैश्यांची प्रतिपूर्ती बेस्टमार्फत कधीपर्यंत व कशा तऱ्हेने करण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१९) :** (१) व (२) बेस्ट प्रवाशांच्या सोयीसाठी व प्रवाशांना आकर्षित करण्यासाठी सुरु असलेली स्मार्टकार्ड योजना बेस्ट उपक्रमाच्यावतीने कार्यान्वित करण्यात येत असून, काही तांत्रिक अडचणींमुळे नवीन स्मार्टकार्डचे वितरण स्थगित करण्यात आले आहे.

तसेच, बसपास योजनेचे अद्ययावतीकरण सुरु असून, दरम्यानच्या कालावधीमध्ये “ई-पर्स” स्मार्टकार्डधारकांनी मागणी केल्यास, त्यांचे पैसे तातडीने परत करण्यात येत असल्याचे बेस्ट प्रशासनामार्फत कळविण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सामाजिक उत्तरदायित्व निधीत घट झाल्याबाबत

**(३८) ४२८५९ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सामाजिक उत्तरदायित्व निधीमध्ये सन २०१५-१६ वर्षाच्या तुलनेत सन २०१६-१७ मध्ये घट झाली असून वस्तू व सेवा कर प्रणाली व निश्चलनीकरणामुळे उद्योगधंद्यांच्या उत्पन्नावर परिणाम झाल्यामुळे सामाजिक उत्तरदायित्व निधीवर परिणाम झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाने सामाजिक उत्तरदायित्व निधीमध्ये आलेल्या घटीचा अभ्यास करुन नेमक्या कारणांचा शोध घेतला आहे काय, ती कारणे कोणती आहेत व त्यासंदर्भात शासनाने कोणत्या उपाययोजना केल्या आहेत,
(३) नसल्यास, शासन या संदर्भातील कारणांचा शोध घेण्यासाठी एक अभ्यास समिती नियुक्त करणार आहे काय ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (३०-०१-२०१९) :** (१) सदर विषय केंद्र शासनाच्या अखत्यारीत येतो. दिनांक १३/०७/२०१८ रोजीच्या केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या माहितीनुसार मोठ्या संख्येने कंपनीने अद्याप त्यांचे १६-१७ आर्थिक वर्षाचे विवरण पत्र दाखल केलेले नाही. त्यामुळे राष्ट्रीय कॉर्पोरेट सामाजिक उत्तरदायित्वचे डेटा पोर्टल अद्याप अद्ययावत झालेले नाही. त्यामुळे सन २०१५-१६ व २०१६-१७ च्या कॉर्पोरेट सामुदायिक उत्तरदायित्व निधीद्वारे परिणाम झालेला आहे किंवा नाही ह्याची सरळ तुलना करण्यात येत नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबई पोलीस आयुक्तालयाने नविन परिमंडळाच्या निर्मितीच्या प्रस्तावाबाबत

**(३९) ४३९२९ (१६-०८-२०१३). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबईचे वाढते नागरीकरण, आंतरराष्ट्रीय विमानतळाची निर्मिती आणि नव्याने भर पडलेल्या दोन पोलीस आठण्याच्या पार्श्वभूमीवर नवी मुंबई पोलीस आयुक्तालयाने नविन परिमंडळाच्या निर्मितीची (पोलीस उपायुक्त) मागणी करणारा प्रस्ताव गृह विभागाकडे पाठविला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्याचप्रमाणे नवी मुंबईजवळ असलेला खालापूर आणि रसायणी पोलीस आयुक्तालयाला जोडण्याची मागणी देखील करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, त्यानुसार सदरहू प्रस्तावावर शासनाने कोणता निर्णय घेतला आहे वा घेण्यात येत आहे,
(४) असल्यास निर्णयाचे थोडक्यात स्वरुप काय आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, तथापि, स्थानिक जनतेचा प्रक्रियेस असणारा विरोध लक्षात येऊन विशेष पोलीस महानिरीक्षक कोकण परिक्षेत्र, नवी मुंबई यांचे अभिप्राय पोलीस

महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी मागविले आहे. सर्व बाबी लक्षात घेऊन निर्णय घेण्यात येईल.
(३), (४) व (५) बाबत महाराष्ट्र राज्य पोलीस दलात ६१,३९४ पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

---

## मुंबईतील ऑबेरॉय बिल्डर्सच्या नावाने महापालिकेने नोटीस बजावल्याबाबत

**(४०) ४४१७५ (०५-१२-२०१८). डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे, श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील ओशिवरा भागातील ओबेरॉय बिल्डर्सच्या ओबेरॉय स्काय हाईट्स या उत्तुंग इमारतीला सन २००८ मध्ये प्रत्येक मजल्यावर सहा घरांकरीता ओसी दिली असून ३ ते ४ शयनगृहाची मोठी घरे बनविण्याकरीता छोटया घरांमध्ये वास्तू फेरफार केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत महापालिकेने विकासक व सोसायटीला नोटीस देऊन इमारतीच्या मूळ नकाशाप्रमाणे पुन्हा सर्व घर होती तशी पूर्ववत करण्याबाबत कळविले असूनही उक्त नोटीसला कोणतेही उत्तर न दिल्यामुळे महापालिकेने माहे एप्रिल, २०१८ मध्ये विकासक ओबेरॉय यांच्या नावाने कलम ५३ (१) एमआरटीपी ॲक्टनुसार नोटीस बजावली होती, हे ही खरे आहे काय,
(३) तसेच ओबेरॉय बिल्डरचे राजेंद्र नगर, बोरिवली येथील मुख्य रस्त्यावर इमारतीच्या कामामुळे मोठ्या प्रमाणात धुळीचे साम्राज्य पसरल्याने वाहनचालकांना व स्थानिकांना त्रास होवून श्वसनाचा आजार होण्याची क्षक्यता असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून उक्त प्रकरणी मुंबई महानगरपालिकेच्या आर.मध्य विभागाकडे स्थानिकांनी वारंवार तक्रार करुनही कोणतीच कारवाई करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार ओबेरॉय बिल्डरवर कोणती कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१९) :** (१) ओशिवरा भागातील ओबेरॉय स्काय हाईट्स इमारतीचे बांधकाम प्रगतीपथावर असताना, विविध अनियमितता व इमारत बांधकामे मंजूर आराखड्याप्रमाणे पूर्ववत करण्याबाबत विकासकास महानगरपालिकेमार्फत दिनांक १४/१२/२००७ रोजी महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम १९६६ च्या कलम ५३(१) अन्वये नोटीस बजावण्यात आली होती.

तथापि, सदर इमारतीच्या सुधारीत आराखड्यांना आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांची मंजुरी प्राप्त करुन सदर इमारतीस दिनांक १२/११/२००८ रोजी भोगवटा प्रमाणपत्र देण्यात आले होते.

तद्नंतर सदर इमारती प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने, ओबेरॉय स्काय हाईट्स या इमारतीच्या स्थळ पाहणीत, भोगवटा प्रमाणपत्रासोबतच्या मंजूर आराखड्यांच्या विपरीत बांधकामे आढळून आल्याने, महानगरपालिकेने एप्रिल, २०१८ मध्ये सदर इमारतीस महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम १९६६ च्या कलम ५३(१) अन्वये नोटीस बजावण्यात आल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(२) बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत ओबेरॉय स्काय हाईट्स सोसायटीच्या विकासकास दिनांक ०३/०८/२०१८ रोजी अंतिम आदेश पारित केल्यानंतर, सोसायटी व विकासकाने दिनांक २८/०८/२०१८ रोजी सदर इमारतीच्या सुधारीत आराखड्यांबाबत प्रस्ताव दाखल करुन कारवाईस स्थगिती देण्याची विनंती केली.

सदर विनंतीनुसार सदर इमारती प्रकरणी अंतिम निर्णय होईपर्यंत पुढील कारवाईस स्थगिती देण्यात आली असल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(३) व (४) दत्तपाडा रोडवरील लगतच्या भूखंडावर बांधकाम सुरु असल्यामुळे धुळीपासून त्रास होत असल्याबाबतची तक्रार दिनांक १०/१०/२०१८ रोजी

महानगरपालिकेस प्राप्त झाल्यानंतर, संबंधित विकासक व वास्तुविशारद यांना धुळीमुळे होणाऱ्या त्रासावर योग्य ती उपाययोजना करण्याबाबत सूचित करण्यात आल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सांगोला (जि.सोलापूर) शहरातील रामोशी गल्ली येथील नगरपरिषदेच्या सार्वजनिक शौचालयाची दैनंदिन स्वच्छता होत नसल्याबाबत

**(४१) ४४४५१ (०५-१२-२०१८). ॲड.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सांगोला (जि.सोलापूर) शहरातील रामोशी गल्ली येथील नगरपरिषदेच्या सार्वजनिक शौचालयाची दैनंदिन स्वच्छता होत नसल्याने तुडूंब भरले असल्याचे दिनांक १२ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त ठिकाणी नागरीकांना दुर्गंधीचा सामना करावा लागत असून शौचालयांचे दरवाजेही नादुरुस्त असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर शौचालयाची दैनंदिन स्वच्छता करण्यासोबतच नादुरुस्त दरवाजे, उघडे ड्रनेज पाईप यांची दुरुस्ती करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१९) :** (१), (२) व (३) यासदंर्भात दिनांक १२/८/२०१८ रोजीच्या दैनिक लोकमत वर्तमान पत्रात बातमी प्रसिध्द झाली होती. सदर बातमी शौचालयाचे दुरुस्ती सुरु असताना प्रसिध्द झाल्याचे दिसून आले आहे.

सदर शौचालयाच्या दुरुस्तीचे काम पूर्ण झाले असून रामोशी गल्ली येथील सार्वजनिक शौचालयाची नगरपरिषदेकडून दिनांक ५/१२/२०१८ रोजी स्थळ पाहणी केली, त्यामध्ये सदरच्या ठिकाणचे सार्वजनिक शौचालयाचे दरवाजे सुस्थितीत असून शौचालयाचे भांडे फुटलेले नाही, त्याचबरोबर सभोवतालचा परिसर स्वच्छ आहे, असे आढळून आले आहे.

रामोशी गल्ली येथे नागरिकांच्या सोईसाठी नगरपालिकेने शौचालय बांधलेले असून पुरुषांसाठी १४ व स्त्रियांसाठी ६ एवढ्या सीट्स उपलब्ध आहेत. सांगोले शहरातील सर्व सार्वजनिक व सामुदायिक शौचालयाची दैनंदिन स्वच्छता करणेसाठी श्री स्वामी समर्थ बहुउद्देशीय सेवा संस्था, सांगोला यांची नेमणूक वार्षिक घनकचरा व्यवस्थापन ठेक्यामध्ये केली आहे. सदर संस्थेमार्फत दैनंदिन दोन वेळा शौचालयाची स्वच्छता केली जाते. सदर भागात पुरुष व स्त्रियांसाठी एक-एक युनिट वापरासाठी आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात शासकीय/निमशासकीय कर्यालयातील नस्त्या प्रलंबित असल्याबाबत

**(४२) ४४५१३ (०५-१२-२०१८). ॲड.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शासकीय/निमशासकीय कार्यालयातील कोणत्याही विभागातील नस्ती शासकीय कर्मचाऱ्याकडे सात दिवसापेक्षा अधिका काळ प्रलंबित राहणार नाही असा कायदा असूनही शासकीय/निमशासकीय कार्यालयात नस्त्यांचे थर टेबलावर साचत असल्याचे दिनांक १८ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त नस्तींचा त्वरीत निकाल लावून निपटारा करण्याबाबत शासनस्तरावरुन कोणत्या स्वरुपाची कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद जिल्ह्यातील कोकणवाडीतील हॉटेलवर मारलेल्या धाडीबाबत

**(४३) ४४६९१ (०५-१२-२०१८). श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.वजाहत मिर्झा, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद जिल्ह्यातील कोकणवाडीतील एका हॉटेलवर मारलेल्या धाडीत ९७ तरुण-तरुणी मद्यधुंद अवस्थेत डी.जे तालावर थिरकत असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कोकणवाडीतील हॉटेल शैलबाबत एका समाजसेवकाने केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने गुन्हे शाखेने सदरहू हॉटेलवर धाड टाकली असता हॉटेलच्या एका हॉलमध्ये डी.जे.च्या तालावर आणि रोषणाईत अनेक तरुण जोडपी थिरकत असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, पोलीस कारवाई दरम्यानही त्यापैकी काही जण हातातील पेग (दारु) संपवित असल्याचे दिसून आले असून अशा हॉटेल संस्कृतीमुळे सार्वसामान्य जनतेला त्याचा नाहक त्रास सहन करावा लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार संबंधितांवर कोणती कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०१-२०१९) :** (१), (२) व (३) गुप्त बातमीदारामार्फत मिळालेल्या माहितीच्याआधारे पोलिसांनी औरंगाबाद शहरातील कोकणवाडीतील एका हॉटेलवर मारलेल्या धाडीत ९९ तरुण-तरुणी मद्यधुंद अवस्थेत डी.जे.तालावर थिरकत असल्याचे दिनांक ५ ऑगस्ट, २०१८ रोजी निदर्शनास आले. तसेच पोलीस कारवाई दरम्यान काही तरुण-तरुणी मद्यधुंद अवस्थेत थिरकताना दिसून आले.

(४) सदर प्रकरणी ५ आरोपींविरुध्द ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० चे उल्लंघन केले म्हणून पर्यावरण (संरक्षण) अधिनियम १९८६ चे कलम १५ व कलम ६६ (ई), ६६(फ), महामद्य निषेध अधिनियम १९४९, ३३(W)(X)(A)/१३१, महा.पोलीस कायद्याप्रमाणे वेदांतनगर पो.स्टे.औरंगाबाद शहर येथे गु.र.क्र.१०१/२०१८ भा.दं.वि.स.कलम ३९२, ३४ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्हयात आरोपींविरुध्द दोषारोपपत्र सादर करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे. सद्य:स्थितीत गुन्हा तपासावर आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील दहिसर येथील नवा गाव इनामदार चाळीत राहणाऱ्या भाडेकरुने अनधिकृत दुमजली बांधकाम केल्याबाबत

**(४४) ४४८६९ (०५-१२-२०१८). अॅड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील दहिसर येथील सर्वे नं. १५२ भाग १ सीटीएस नं. ८८० येथे नवा गाव इनामदार चाळीत राहणाऱ्या भाडेकरुने चाळ मालकाची परवानगी न घेता दुमजली अनधिकृत बांधकाम केल्याने चाळमालकांनी तक्रार करुन सुध्दा महानगरपालिका अधिकारी दुर्लक्ष करीत असल्याने चाळ मालकाने पालिका मुख्यालयासमोर आत्मदहन करण्याचा इशारा दिला असल्याची बाब माहे ऑगस्ट, २०१८ च्या चौथ्या सप्ताहात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१९) :** (१), (२) व (३) दहिसर येथील सर्वे नं. १५२ भाग १ सीटीएस क्रमांक ८८० येथील बांधकामाबाबत बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने, सदर अनधिकृत बांधकामास मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ च्या कलम ३५१ अन्वये नोटीस बजावली असून, पुढील कार्यवाही सुरु आहे.

तसेच, तक्रारदाराने माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये आत्मदहनाचा इशारा दिला नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

---

## राज्यातील स्थानिक लोकांना नोकऱ्या देण्याबाबत

**(४५) ४५१२३ (०७-१२-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील स्थानिक लोकांना ८० टक्के नोकऱ्या देण्याचे शासनाचे धोरण आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त धोरणाची अंमलबजावणी करण्याकरीता शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१९) :** (१) स्थानिक उमेदवारांना राज्य शासकीय सेवेतील प्रवेशाकरीता प्राधान्य देण्याबाबत राज्य शासनाचे कोणतेही धोरण नाही. मात्र राज्याच्या अनुसूचित क्षेत्रातील १७ संवर्गामधील १००% पदे स्थानिक अनुसूचित जमातीच्या उमेदवारांमधून भरण्याबाबत राज्य शासनाकडून वेळोवेळी शासन अधिसूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

याखेरीज औद्योगिक विकासाच्या लाभामध्ये स्थानिक जनतेला योग्य वाटा मिळावा, या उद्देशाने राज्यातील सर्व औद्योगिक घटकांमध्ये पर्यवेक्षकीय श्रेणीत किमान ५०% व पर्यवेक्षकीयसहीत इतर श्रेणीत किमान ८०% स्थानिक उमेदवारांना नोकऱ्यांमध्ये प्राधान्य घेण्याबाबत, तसेच नोकर भरती करणारा अधिकारी मराठी जाणणारा असावा या शासनाच्या धोरणाची अंमलबजावणी करण्याकरीता उद्योग, ऊर्जा कामगार विभागाने कार्यपध्दती

विहित केली आहे. तसेच राज्यातील स्थानिक सुशिक्षित बेरोजगारांना स्थानिक व इतरत्र स्तरावर औद्योगिक आस्थापनांमध्ये रोजगार व स्वयंरोजगाराद्वारे रोजगार उपलब्ध होण्यासाठी जिल्हास्तरीय / औद्योगिक क्षेत्र स्तरावर मा.मंत्री (उद्योग) यांच्या मान्यतेने रोजगार व स्वयंरोजगार मेळावे आयोजित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई-विरार शहर महानगरपालिकेला अनुशेष अनुदानाची रक्कम मिळण्याबाबत

**(४६) ४५१२८ (०५-१२-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई-विरार शहर महानगरपालिकेला विविध विकास कामांसाठी कोट्यावधी रुपयांची अनुशेष अनुदानाची रक्कम त्वरित मंजूर करण्याची विनंती स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनाकडे वेळोवेळी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी कोणता निर्णय घेण्यात आला आहे व त्याची पूर्तता केव्हापर्यंत होणे अपेक्षित आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे आहे आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) मा.श्री.हितेंद्र ठाकूर, विधानसभा सदस्य यांनी वसई-विरार शहर महानगरपालिकेस शासनाकडून देय असलेल्या रुपये ६५३७.२० लक्षची मागणी दिनांक २१/०५/२०१७ च्या पत्रान्वये केली आहे.
(२) उपरोक्त देय अनुदानापैकी रुपये २२६२.२० लक्ष इतके अनुदान महानगरपालिकेस प्राप्त झाले असल्याचे वसई-विरार शहर महानगरपालिकेने कळविले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई-विरारसाठी जलवाहिन्यांचे लेखापरिक्षण करण्याबाबत

**(४७) ४५१४१ (३०-११-२०१८). श्री.रविंद्र फाटक, ॲड.अनिल परब, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई-विरार महापालिकेला पाणीपुरवठा करणाऱ्या सूर्या व उसगाव जलवाहिन्यांचे मुंबई आयआयटीमार्फत स्ट्रक्चरल व हायड्रोलिक लेखापरिक्षण करण्याचा निर्णय महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त लेखापरिक्षणाच्या कामासाठी अंदाजे किती खर्च येणार आहे,
(३) असल्यास, पाणीपुरवठा योजनेचे लेखापरिक्षण झाल्यानंतर वसई-विरार महानगरपालिका क्षेत्रात योग्य दाबाने पाणीपुरवठा करण्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२५-०१-२०१९) :** (१), (२) व (३) सुर्या व उसगाव मुख्य जलवाहिन्यांचे स्ट्रक्चरल व हायड्रॉलिक ऑडिट भारतीय प्राद्योगिक संस्थान, मुंबई (IIT) मार्फत करण्याचा निर्णय वसई विरार-शहर महानगरपालिकेने दिनांक १६/०७/२०१८ रोजी घेतला आहे व याकरीता भारतीय प्राद्योगिक संस्थान, मुंबई (IIT) मुंबई यांना रुपये ४७,९०,००० अदा करण्यात आले आहेत.

भारतीय प्राद्योगिक संस्थान, मुंबई (IIT) यांचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर याप्रकरणी नियमोचित कार्यवाही करण्यात येणार असल्याचे वसई-विरार शहर महानगरपालिकेने कळविले आहे.

---

## नंदुरबार जिल्ह्यातील अक्कलकुवा ग्रामपंचायतीला नगर पंचायत घोषित करण्याबाबत

**(४८) ४५३८७ (०५-१२-२०१८). श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे : तारांकित प्रश्न क्रमांक ४२६१६ ला दिनांक ४ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने राज्यातील तालुकास्तरावरील ग्रामपंचायतींना नगरपंचायतीचा दर्जा दिला असून नंदुरबार जिल्ह्यातील अक्कलकुवा हे तालुका मुख्यालय ग्रामपंचायत असून त्याला नगरपंचायत घोषित करण्यात आलेले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गत अधिवेशनात त्वरीत अंमलबजावणीचे शासनाने आश्वासन दिलेले असतानाही कोणतीही कार्यवाही करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-०१-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) राज्यात नव्याने निर्माण करण्यात येत असलेल्या नगरपरिषदा/नगरपंचायतींमुळे येणारा आर्थिक भार, नागरिकांना सोयी-सुविधा पुरविणे, निधीची उभारणी, नियोजनबध्द विकास इत्यादी बाबी विचारात घेऊन, यापुढे नविन नगरपरिषदा/नगरपंचायती स्थापन करण्यासंदर्भातची बाब तपासण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आर.सी.एफ. पोलीस ठाणे, चेंबूर येथील कुख्यात गुंड यांचेकडून देण्यात आलेल्या विनयभंग व जीवे मारण्याच्या धमकीबाबत

**(४९) ४५७९८ (०५-१२-२०१८). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आर.सी.एफ. पोलीस ठाणे, चेंबूर येथे श्रीमती दिपाली भोसले यांनी कुख्यात गुंड श्री.सय्यद अन्सारी यांच्याकडून झालेल्या विनयभंग व जीवे मारण्याच्या धमकीबाबत दिनांक १४ जुलै, २०१८ रोजी वा त्यासुमारास एफ.आय.आर. नोंदविली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी आर.सी.एफ. पोलीस ठाण्याचे वरिष्ठ पोलीस निरीक्षक, श्री.देसाई कोणतीही कारवाई न करता सय्यद अन्सारी यांना पाठीशी घालण्याचा प्रयत्न करीत असून स्थानिक लोकप्रतिनिधींनी देखील आरोपीवर कारवाई करण्याकरीता वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांकडे विनंती केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, श्रीमती दिपाली भोसले यांनी त्यांची तक्रार मागे घेण्याबाबत श्री.सय्यद अन्सारी यांच्या कुटूंबियांकडून सुध्दा धमकी तसेच त्यांना मदत करणाऱ्याविरुध्द पोलीस स्टेशनमध्ये तक्रार करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कुख्यात गुंडावर कारवाई करुन श्रीमती दिपाली भोसले यांना न्याय देण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

फिर्यादीने दिलेल्या तक्रारीवरून आर.सी.एफ. पोलीस ठाणे, चेंबूर येथे गु.र.नं. २४९/१८ कलम ३५४, ३५४ (अ)(ड,) ५०६ (२) भा.दं.वि. अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

(२) व (३) फिर्यादी यांना तक्रार मागे घेण्याबाबत धमकी देणाऱ्याविरूध्द आर.सी.एफ. पोलीस ठाण्यात गु.र.नं. ३०८/१८ कलम ५०६, ५०६(२), ३४ भा.दं.वि. प्रमाणे दिनांक ३१/०८/२०१८ रोजी गुन्हा दाखल असून सदर गुन्हा तपासाधीन आहे.

(४) फिर्यादी यांना न्याय देण्याच्यादृष्टीने तिने पोलीस ठाण्यास वेळोवेळी दिलेल्या तक्रारी वरून वेगवेगळे गुन्हे नोंद करण्यात आले असून नमूद गुन्ह्यातील अटक आरोपी हा जामिनावर मुक्त झाल्याने फौ.दं.प्र.स.कलम १०७ अन्वये दिनांक १०/०८/२०१८ रोजी त्याच्याविरूध्द प्रतिबंधकात्मक कारवाई करण्यात आलेली असून सदर गुन्हा तपासाधीन आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सिध्दार्थ महाविद्यालयात सन २००५ मध्ये प्रात्यक्षित परीक्षा न देता कायद्याची पदवी मिळविल्याबाबत

**(५०) ४७७०९ (१५-०१-२०१४). डॉ.निलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पीपल्या एज्युकेशन सोसायटी या मुंबईतील सिध्दार्थ महाविद्यालयात सन २००५ मध्ये प्रात्यक्षित परीक्षा न देता कायद्याची पदवी मिळविल्याप्रकरणी सात आयपीएस अधिकाऱ्यांवर १५ दिवसात गुन्ह्यात नोंद करावा अन्यथा सदर प्रकरण केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सीबीआय) विभागाकडे सोपवा अशी शिफारस राष्ट्रीय मागासवर्गीय आयोगाने राज्य शासनाला दिनांक ०३ सप्टेंबर, २०१३ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी शासनाने कोणता निर्णय घेतला आहे व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१), (२) व (३) या संदर्भात केंद्र शासन/राज्य शासन तसेच पोलीस महासंचालक कार्यालयाकडे कोणतीही सूचना/निर्देश प्राप्त झालेले नाहीत.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.